**मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उ.) पैठण, जिल्हा-छत्रपति संभाजीनगर या संस्थेंतील विद्यमान लेकव्हयू इमारतीशेजारी प्रशिक्षणार्थी यांच्याकरिता निवासस्थान इमारत व दोन प्रशिक्षण केंद्रे (डायनिंग हॉल व स्वयंपाकघरासहीत) व अतिरिक्त १० निवासी कक्ष, १ संमेलन कक्ष, ग्रंथालय व संगणक कक्ष या G+1 बांधकामास निधी वितरित करणेबाबत.**
**( सन २०२२-२३ ) कार्यक्रमांतर्गत ५३ मोठी बांधकामे ( ४०७० ०२३१ )**

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन निर्णय क्रमांक : बीयुडी -२०२२/प्र.क्र.२६/२२/१२-अ,**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : २८ मार्च, २०२३.

संदर्भ :- १. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं २०२२/प्र.क्र.४३ /अर्थसंकल्प ३, दि.०४.०४. २०२२.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : मप्रप्र -२०१५/१०९०/प्र.क्र.२०२/१५/१२-अ, दि.२४ फेब्रुवारी,२०१६ व दि.२ मार्च,२०१६
३. शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक: बीयुडी -२०२२/प्र.क्र.२६/२२/१२-अ, दि.०६.०६.२०२२
४. शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक: बीयुडी -२०२२/प्र.क्र.२६/२२/१२-अ, दि. २५ जानेवारी,२०२३
५. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं २०२२/प्र.क्र.४३ /अर्थसंकल्प ३, दि.१६.३.२०२३

**प्रस्तावना :-**

मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी नाथनगर उ. पैठण, जिल्हा-छत्रपति संभाजीनगर या संस्थेमधील प्रशिक्षणार्थी यांच्याकरिता निवासस्थान इमारत व दोन प्रशिक्षण केंद्रे (डायनिंग हॉल व स्वयंपाकघरासहीत) मूळ ९२२ चौमी या बांधकामामध्ये बदल करुन त्यामध्ये १० निवासी कक्ष, १ संमेलन कक्ष, ग्रंथालय व संगणक कक्ष यांचा समावेश करुन G+1 या प्रमाणे १७२० चौमी. इतक्या अतिरिक्त बांधकामाच्या **एकूण रु.५,८३,२७,३३७ /- (रुपये पाच कोटी, त्र्याऐंशी लाख, सत्तावीस हजार, तीनशे सदोतीस फक्त) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये सुधारित प्रशासकीय मान्यता दिली** आहे. यापूर्वी संदर्भाधीन क्र. २ अन्वये प्रशासकीय मान्यता देऊन संस्थेच्या सदर बांधकामासाठी रु.२८०.०० लाख इतका निधी वितरित करण्यात आला आहे.

२. संदर्भाधीन क्र.१ अन्वये सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात रु.५०.०० लाख इतकी अर्थसंकल्पिय तरतूद मंजूर करण्यात आली आहे. या तरतुदीमधून संदर्भाधीन क्र.४ च्या शासन निर्णयान्वये **रु.२१,००,००० /- (रुपये एकवीस लाख फक्त) इतका निधी वितरित करण्यात आला आहे.** आता संदर्भाधीन क्र.५ अन्वये वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये सुधारित अंदाजानुसार उपलब्ध झालेला रु.२९.०० लाख इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

३. संदर्भाधीन क्र.३ येथे नमूद शासन निर्णयान्वये विहित केलेल्या बांधकामाकरिता मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर उ. पैठण, जिल्हा-छत्रपति संभाजीनगर, या संस्थेस सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात रु.५०,००,०००/- (अक्षरी रुपये पन्नास लाख मात्र) इतक्या अर्थसंकल्पिय तरतुदीनुसार **रु.१५,००,००० /- ( रुपये पंधरा लाख फक्त)** मागणी क्र. ए-९, मुख्य लेखाशीर्ष ४०७०-इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च ( ००) ००३, प्रशिक्षण (००) (०१) राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत नवीन प्रशिक्षण संस्था स्थापन करणे ( ४०७० ०२३१ ) ५३ मोठी बांधकामे" या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. यावर होणारा **रु.१५,००,००० /- ( रुपये पंधरा लाख फक्त )** इतका खर्च मागणी क्र. ए-९, मुख्य लेखाशीर्ष ४०७०-इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च ( ००) ००३, प्रशिक्षण (००) (०१) राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत नवीन प्रशिक्षण संस्था स्थापन करणे ( ४०७० ०२३१ ) ५३ मोठी बांधकामे"या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. सदरहू मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

६. संस्थेने आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

७. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-छत्रपति संभाजीनगर या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

८. प्रस्तुत शासन निर्णय, नियोजन व वित्त विभागाच्या अनुक्रमे, अनौ.संदर्भ क्र.१३८/१४४३ दि. २१.०३.२०२३ व अनौ.संदर्भ क्र. १८९/२०२३/व्यय-४ दि.२४.०३.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे .

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३२८१४५१३११६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAUMUDI RAVINDRA MARGAJ

Digitally signed by KAUMUDI RAVINDRA MARGAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=86b41f0c8c4d9cee4d4b8d9e6a2f78b63ed85082bb42fbb618ff074d97dd8622, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=367FC9F5DAA15F4A0F19196A388639367A57BDA9ED0C495EA0C57DA461234AB8, cn=KAUMUDI RAVINDRA MARGAJ
Date: 2023.03.28 14:56:48 +05'30'

**( कौमुदी र. मरगज )**
**अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग.**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१,/२ मुंबई, नागपूर,
२. विभागीय आयुक्त, जिल्हा-छत्रपति संभाजीनगर.
३. उपमहासंचालक, राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
४ संचालक , मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-छत्रपति संभाजीनगर
५ उप संचालक, लेखा व कोषागारे, जिल्हा-छत्रपति संभाजीनगर
६ जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा-छत्रपति संभाजीनगर
७ उप कोषागार कार्यालय, पैठण, जिल्हा-छत्रपति संभाजीनगर
८. नियोजन विभाग, ( कार्यासन १४४३) मंत्रालय, मुंबई
९. वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई
१०. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-२५. मंत्रालय, मुंबई
११. निवडनस्ती (कार्या.१२-अ).